पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वकांक्षी उपक्रमाकरीता समित्यांची स्थापना करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : आयडीसी २०२१/प्र.क्र.५३८/उद्योग-१४.**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १३ एप्रिल , २०२२.

संदर्भ :- विशेष सचिव (लॉजिस्टीक) यांचे पत्र क्र.नॅशनल मास्टर प्लॅन/लॉजिस्टीक /२०२१, दि. २१/१२/२०२१.

प्रस्तावना -:

पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन हा विविध आर्थिक क्षेत्रांकरीता मल्टिमॉडल कनेक्टिव्हिटी पायाभूत सुविधा उभारणीबाबतचा केंद्र शासनाचा महत्वकांक्षी उपक्रम आहे. सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रत्येक राज्याने राज्य स्तरावरील माहिती (Data) एकत्रित करून स्टेट मास्टर प्लॅन तयार करून सदर प्लॅन BISAG-N या GIS पोर्टल वर भरण्याबाबतच्या सूचना विशेष सचिव (लॉजिस्टीक्स), वाणिज्य व उद्योग मंत्रालय, भारत सरकार यांच्या संदर्भाधीन दि.२१/१२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये देण्यात आल्या आहेत.

२. त्यानुषंगाने पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमाकरीता राज्यस्तरावरील माहिती (Data) एकत्रित करून स्टेट मास्टर प्लॅन तयार करून सदर प्लॅन BISAG-N या GIS पोर्टल वर सादर करण्याविषयी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. १७/०२/२०२२ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती.

३. सदर बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन हा उपक्रम राज्यात कार्यक्षमपणे राबविण्याकरीता करीता सचिव स्तरीय शक्तीप्रदान समिती (Empowered Group of Secretaries), नेटवर्क प्लॅनिंग ग्रुप (Network Planning Group), तांत्रिक सहायता गट (Technical Support Unit) या समित्या स्थापनेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वकांक्षी उपक्रमाकरीता राज्य स्तरावर करावयाच्या कार्यवाहीकरीता पुढील प्रमाणे (प्रपत्र अ, ब व क) समित्यां स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(प्रपत्र -अ)**

**सचिव स्तरीय शक्तीप्रदान समिती (Empowered Group of Secretaries):-**

- **अध्यक्ष**- मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
- **सदस्य सचिव:-** अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग उर्जा व कामगार विभाग.
- **सदस्य :-**

१) अपर मुख्य सचिव (महसूल),महसूल व वन विभाग.
२) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग.
३) अपर मुख्य सचिव (परिवहन व बंदरे),गृह विभाग.
४) प्रधान सचिव (नगर विकास १),नगर विकास विभाग.
५) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग.
६) प्रधान सचिव,पर्यावरण व वातारवणीय बदल विभाग.
७) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग.
८) प्रधान सचिव,पर्यटन, विमान चालन व राज्य उत्पादन शुल्क विभाग,
९) प्रधान सचिव,सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान).
१०) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
११) प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग.
१२) सचिव (कृषी),कृषी व प.दु.म.विभाग
१३) सचिव,अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१४) सचिव (प्रकल्प समन्वय),जलसंपदा विभाग.

**(प्रपत्र-ब)**

**नेटवर्क प्लॅनिंग ग्रुप (Network Planning Group) :-**

- **अध्यक्ष :- अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग उर्जा व कामगार विभाग.**
- **सदस्य सचिव :- मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.**
- **सदस्य :-**
  - **विभागीय नोडल अधिकारी**

१) नगर विकास विभाग - प्रधान सचिव (नगर विकास-१).
२) वित्त विभाग - प्रधान सचिव (व्यय).
३) ऊर्जा विभाग - प्रधान सचिव (ऊर्जा).
४) पर्यावरण व वातारवणीय बदल विभाग - प्रधान सचिव, पर्यावरण व वातारवणीय बदल विभाग

५) सार्वजनिक बांधकाम विभाग - व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ.

६) बंदरे (गृह विभाग) - मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ.

७) वन विभाग - अतिरिक्त मुख्य वन संरक्षक,वन विभाग.

८) विमान चालन विभाग - व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमान विकास महामंडळ.

९) परिवहन (गृह विभाग) - परिवहन आयुक्त, परिवहन आयुक्त कार्यालय.

१०) रेल्वे विभाग - व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र रेल्वे पायाभूत सुविधा विकास महामंडळ.

११) जीआयएस ॲण्ड रिमोट सेन्सिंग- संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग ॲप्लिकेशन सेंटर.

१२) सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान) - संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, महाराष्ट्र राज्य.

१३) सेझ - विकास आयुक्त,सिप्झ.अंधेरी, मुंबई.

१४) सिडको- व्यवस्थापकीय संचालक, शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (सिडको).

१५) फार्मा पार्क, बीडीपी, एमडीपी - आयुक्त, अन्न व औषध प्रशासन.

१६) जलसंपदा विभाग - सचिव (प्रकल्प समन्वय),जलसंपदा विभाग.

१७) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग (वस्त्रोद्योग)- आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य.

१८) पर्यटन विभाग - व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ.(MTDC)

१९) कृषी विभाग - आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य.

२०) अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग - आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य.

२१) महसूल विभाग - जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य.

**(प्रपत्र-क)**

तांत्रिक सहायता गट (Technical Support Unit) :-

- **अध्यक्ष :-** मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.
- **सदस्य सचिव :-** सह मुख्य कार्यकारी अधिकारी (विशेष प्रकल्प), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.

- **सदस्य :-**
  - ✓ महाव्यवस्थापक (माहिती तंत्रज्ञान), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.
  - ✓ लॉजिस्टीक विभाग, डीपीआयआयटी, भारत सरकार.
  - ✓ तंत्रज्ञान भागीदार -BISAG-N, MRSAC, MIDC.
  - ✓ प्रकल्प अंमलबजावणी भागीदार - केपीएमजी (KPMG)

२. पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमाकरीता राज्य स्तरावर करावयाच्या कार्यवाहीकरीता स्थापन उपरोक्त समित्यांची कार्यकक्षा खालील प्रमाणे आहे :-

१) **सचिव स्तरीय शक्तीप्रदान समिती** (Empowered Group of Secretaries) :- पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्रशासनाचा महत्वकांक्षी उपक्रमाकरीता राज्यस्तरावरील माहिती (Data) एकत्रित करून स्टेट मास्टर प्लॅन तयार करणे. सदर प्लॅन BISAG-N या GIS पोर्टल वर सादर करण्याच्या व सदर उपक्रम राज्यात राबविण्याच्या अनुषंगाने संबधित प्रशासकीय विभागाच्या नोडल अधिका-यांमार्फत करण्यात आलेल्या कार्यवाहीचा वेळोवेळी आढावा घेणे.

२) **नेटवर्क प्लॅनिंग ग्रुप** (Network Planning Group) :- पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमाकरीता राज्यस्तरावरील माहिती (Data) एकत्रित करून स्टेट मास्टर प्लॅन तयार करण्याकरीता संबंधित प्रशासकीय विभागाचे नोडल अधिकारी यांनी प्रशासकीय विभागाचा मास्टर प्लॅन तयार करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने करण्याच्या संबंधित प्रशासकीय विभागाचे नोडल अधिकारी यांनी विभागाचा मास्टर प्लॅन तयार करण्याच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा वेळोवेळी आढावा घेणे.

३) **तांत्रिक सहायता गट** (Technical Support Unit) :- पीएम गतिशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या उपक्रमाकरीता सर्व संबंधित प्रशासकीय विभागाचे नोडल अधिकारी यांनी तयार केलेले प्रशासकीय विभागाचे मास्टर प्लॅन मधील माहिती (Data) एकत्रित करून स्टेट मास्टर प्लॅन तयार करणे. सर्व संबंधित विभागांना वेळोवेळी तांत्रिक सहाय पुरविणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१३१२२५२२४५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.04.13 15:54:37 +05'30'

**(संजय देगांवकर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व संबंधित विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) सह मुख्य कार्यकारी अधिकारी (विशेष प्रकल्प), महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालक,शहर आणि औद्योगिक विकास महामंडळ (CIDCO), मुंबई.
९) व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ,मुंबई.
१०) संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग ॲप्लिकेशन सेंटर, मुंबई.
११) विकास आयुक्त,सिप्झ अंधेरी, मुंबई.
१२) आयुक्त (वस्त्रोद्योग),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१३) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य. पुणे.
१५) निवडनस्ती- (उद्योग-१४)